**मुळा मोठा प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर अंतर्गत अहमदनगर मनमाड महामार्ग ते मुळा धरण ( ८.१० ) कि.मी. पोहोच रस्ता दुरूस्ती कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.३३९/२०२१)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: ०१ एप्रिल २०२२

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम/सिंचन-१/ धा-२३५ / २०२१ / ९२३८ दि. १२/११/२०२१.
२. शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/(५५१/१७)/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि १/१/२०१५.

प्रस्तावना:-

मुळा नदीवर मौजे बारागांव नांदूर येथे सन १९७२ मध्ये मुळा धरण बांधुन पूर्ण झाले आहे. धरणाच्या बुडीत क्षेत्रामध्ये मौजे वंजारवाडी व इतर ८ गावठाणे गेली असून या गावठाणामधील लोक मौजे बारागांव नांदूर , वावरथ जांभळी, व कुरणवाडी येथे स्थलांतरीत झालेले आहेत. सदर पुनर्वसित गावठाणास अहमदनगर येथे येण्यासाठी पर्यायी व जवळचा रस्ता अद्यापपर्यंत देण्यात आलेला नाही. अहमदनगर-मनमाड रोड ते मुळा धरण पोहोच रस्ता हा जलसंपदा विभागाच्या अखत्यारीत येतो. सदर रस्त्याची एकूण लांबी सुमारे ८.१० कि.मी. इतकी असून रस्त्यावर मोठे मोठे खडडे पडून रस्ता वाहतूकीस अंत्यत खराब झालेला असून वाहतूकीस योग्य नाही.मुळा धरण परिसर व वर्ग पर्यटन क्षेत्र घोषित करण्यांत आलेले आहे. सदर रस्त्यावर पुनर्वसित गावठाणातील लोकांची तसेच पर्यटकांची नेहेमी वर्दळ असते. रस्ता खराब असल्याने सदर पुनर्वसित गांवठाणातील रहिवाशी नेहेमी लोकप्रतिनिधीकडे तक्रार करून रस्ता दुरूस्तीची मागणी करतात.सदर रस्त्याचे काम यापूर्वी सन २०१०-११ मध्ये पूर्ण करण्यांत आले होते.

पावसाळी कालावधीत पूरनियंत्रण व व्यवस्थापनासाठी धरणावर पोहोचणेसाठी हा रस्ता महत्वाचा आहे. त्यामूळे धरण सुरक्षिततेच्या दृष्टीने सदर रस्ता सुस्थितीत असणे आवश्यक असल्याने मुळा मोठा प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर अंतर्गत अहमदनगर मनमाड महामार्ग ते मुळा धरण (८.१०) कि.मी. पोहोच रस्ता दुरूस्ती कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत अंतर्गत मुळा मोठा प्रकल्प ता. राहुरी जि. अहमदनगर अंतर्गत अहमदनगर मनमाड महामार्ग ते मुळा धरण (८.१०) कि.मी. पोहोच रस्ता दुरूस्ती कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती या योजनेच्या रू. **४,७४,१२,६५५ /- (**रू. चार कोटी चौ-याहत्तर लक्ष बारा हजार सहाशे पच्चावन्न फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे**.**

१) तांत्रिक मान्यता , निविदा प्रक्रिया , कामाचे नियोजन व पूर्णत्व , प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण , १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अनुदान (१२)(०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र)(कार्यक्रम) (४७०१ जे १९४) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ०१ सन २०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२२०४०११४४५४९८७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.04.01 14:48:31 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रतः-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१४) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग ,उत्तर महाराष्ट्र प्रदेश , नाशिक
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण ,नाशिक,
१७) कार्यकारी अभियंता, मुळा पाटबंधारे विभाग ,अहमदनगर
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.३३९/२०२१)/ सिंव्य (कामे),

दि. ०१/ ०४ / २०२२ चे सहपत्र

| अ.क्र. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | ३८१४५३९८ |
| २ | Royalty | ३१६३९९३ |
| ३ | १ % Insurance | ३८१४५४ |
| ४ | १२ % GST | ४५७७४४८ |
| ५ | **३ %** Contingencies | **११४४३६२** |
| | Total Rs. | **४,७४,१२,६५५** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.04.01 14:48:46 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )
शासनाचे उप सचिव